**विकास योजना - तुमसर जिल्हा भंडारा**

मौजा तुमसर येथील आरक्षण क्र. २३ "माध्यमिक शाळा" क्षेत्र ०.९५ हेक्टर या पैकी सर्व्हे क्र. १९६ (पै) मधील ५०३.८० चौ.मी. क्षेत्र आरक्षणातून वगळून "विद्यमान सार्वजनिक शौचालय" म्हणून दर्शविणेबाबत महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम ३७(२) नुसार मंजूरी... .

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.:टिपीएस-२३११/१९६०/प्र.क्र.२२३/११/नवि-९,**
**मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**दिनांक : ०८ डिसेंबर, २०११.**

**पहा** :- १) मुख्याधिकारी, तुमसर नगरपरिषद, जि. भंडारा यांचे पत्र क्र.तुन/साबावि/४९७/२०१०, दि. २ डिसेंबर, २०१०.

२) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. वि.यो.तुमसर/आ.क्र.२३/भु.क्र. १९६/कलम -३७/टिपीव्ही-२/४७६९, दि.२९/७/२०११

**शासन निर्णय**:- सोबतची अधिसूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रसिध्द करावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(प्रदीप गोहिल)
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) सह सचिव (नगररचना), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) जिल्हाधिकारी, भंडारा.
५) उप संचालक नगररचना, नागपूर विभाग, नागपूर.
(यांना विनंती की, मंजूर फेरबदल दर्शविणा-या भाग नकाशाच्या तीन प्रती अधिप्रमाणित करण्यासाठी शासनास सादर कराव्यात.)
६) नगर रचनाकार, भंडारा शाखा, भंडारा.
७) मुख्याधिकारी, तुमसर नगर परिषद, जि. भंडारा.
८) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय व ग्रंथागार, नागपूर.
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात भाग-एक मध्ये प्रसिध्द करुन त्यांच्या प्रत्येकी ५ प्रती या विभागास व संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांना पाठवाव्यात.)
९) कक्ष अधिकारी (कार्यासन नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची अधिसूचना विभागाच्या वेबसाईटवर ठेवावी.)
१०) निवडनस्ती (कार्यासन नवि-९)

अधिसूचना
नगर विकास विभाग
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२
दिनांक: ०८ डिसेंबर, २०११.

*महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६*

**क्रमांक:टिपीएस-२३११/१९६०/प्र.क्र.२२३/११/नवि-९,** ज्याअर्थी, तुमसर शहराची (जिल्हा भंडारा) सुधारीत विकास योजना शासन अधिसूचना, नगर विकास व सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. डिपी-तुमसर(सु)/टिपीव्ही-२/४९६१, दि. २० ऑगस्ट, १९९२ अन्वये मंजूर झाली असून ती दि. १ नोव्हेंबर, १९९२ पासून अंमलात आली आहे. (यापुढे "उक्त विकास योजना" असे संबोधले आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेत आरक्षण क्र. २३ "माध्यमिक शाळा" (क्षेत्र ०.९५ हेक्टर) या वापरासाठी आरक्षीत असुन मौजा तुमसर सर्व्हे क्र. १९६(पै.), सिटीसर्व्हे क्र. ८१८ क्षेत्र ५०३.८ चौरस मिटर (५२२७.२० चौ. फुट) क्षेत्राचा समावेश आरक्षीत जागेत आहे (यापुढे ज्यास "उक्त क्षेत्र" असे संबोधीले आहे.) ;

आणि ज्याअर्थी, तुमसर नगर परिषदेने (यापुढे "उक्त नगर परिषद" असे संबोधिले आहे) महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ (सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३७) (यापुढे "उक्त अधिनियम" असे संबोधिले आहे) च्या कलम ३७(१) मध्ये दिलेली वैधानिक पध्दती अनुसरुन उक्त क्षेत्र आरक्षण क्र. २३ "माध्यमिक शाळा" मधुन वगळून "विद्यमान सार्वजनिक शौचालय" म्हणून दर्शविणेबाबतचा फेरबदल प्रस्ताव (यापुढे "उक्त फेरबदल प्रस्ताव" असे संबोधिले आहे) शासनाकडे पाठविला आहे ;

आणि ज्याअर्थी, आवश्यक त्या चौकशी नंतर व संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर उक्त फेरबदल प्रस्ताव मंजूर करावा, असे राज्य शासनाचे मत झाले आहे.

आता, त्याअर्थी उक्त अधिनियमाचे कलम ३७ पोटकलम (२) अन्वये व त्या अनुषंगाने असलेल्या इतर अधिकाराचा वापर करुन उक्त विकास योजनेतील उक्त फेरबदल प्रस्तावास शासन पुढीलप्रमाणे मंजूरी देत आहे आणि त्यासाठी उपरोल्लिखित दि. २० ऑगस्ट, १९९२ ची उक्त विकास योजना मंजूरीची अधिसूचना खालील प्रमाणे सुधारित करण्यात येत आहे.

उक्त विकास योजना मंजूरीच्या अधिसूचनेसोबत जोडलेल्या फेरबदल सूचिच्या शेवटच्या नोंदीनंतर खालील नव्या नोंदीचा समावेश करण्यात येत आहे.

## नोंद

"मौजे तुमसर येथील सर्व्हे क्र. १९६(पै.), सिटीसर्व्हे क्र. ८१८ क्षेत्र ५०३.८ चौरस मिटर (५२२७.२० चौ. फुट) ही जमीन आरक्षण क्र. २३ "माध्यमिक शाळा" मधुन वगळून नकाशात दर्शविल्याप्रमाणे "विद्यमान सार्वजनिक शौचालय" म्हणून दर्शविण्यात येत आहे."

टिप:- (१) उक्त फेरबदल दर्शविणा-या भाग नकाशाची प्रत मुख्याधिकारी, तुमसर नगर परिषद, जिल्हा भंडारा यांच्या कार्यालयांत, कार्यालयीन वेळेमध्ये कामकाजाच्या दिवशी नागरीकांच्या अवलोकनार्थ एक महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आली आहे.

(२) सदर अधिसूचना विभागाच्या www.urban.Maharashtra.gov.in या वेब साईटवर देखील उपलब्ध आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(प्रदीप गोहिल)
**कार्यासन अधिकारी**

# NOTIFICATION

**Government of Maharashtra**
**Urban Development Department**
**Madam Kama Marg, Hutatma Rajguru Chowk,**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated: 8th December, 2011.**

***The Maharashtra Regional & Town Planning Act, 1966***

**No. TPS-2311/1960/CR-223/11/UD-9:-** Whereas, the Development Plan of Tumsar (Dist. Bhandara) has been sanctioned by Government vide Urban Development & Public Health Department's Notification No. DP-Tumsar(R.)/TPV-2/4961, dated 20th August, 1992 and has came into force with effect from 1st November, 1992 (hereinafter referred to as "the said Development plan");

And whereas, in the said Development Plan Site No. 23 is reserved as High School (area 0.95 Ha.) which included the land bearing Survey No. 196 (part), City Survey No. 818 area 503.8 sq.mtr. (5227.20 sq.ft.) (hereinafter referred to as "the said Land") ;

And whereas, the Tumsar Municipal Council (hereinafter referred to as the "said Municipal Council") after following all the legal procedure stipulated under section 37(1) of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Maharashtra XXXVII of 1966) ( hereinafter referred to as "the said Act") has submitted a proposal to delete the said Land from No. 23 "High School" and to designate the land so released as "Exiting Public Latrine" (hereinafter referred to as "the said Modification Proposal") ;

And whereas after making necessary enquiries and consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune Government is satisfied that the said Modification Proposal should be sanctioned ;

Now, therefore, in exercise of the powers conferred under sub-section (2) of section 37 of the said Act, Government hereby sanctions the said Modification Proposal of the said Land and for that purpose amends the above referred notification dated 20th August, 1992 as follows-

In the schedule of Modification appended to the Notification sanctioning the said Development Plan following new entry shall be added after the last entry-

## ENTRY

"The land bearing Survey No. 196 (part), City Survey No. 818 of Mouje Tumsar admeasuring 503.8 sq.mtr. (5227.20 sq.ft.) is deleted from Site No. 23 "High School" and land so released is shown as "Exiting Public Latrine" as shown on plan."

**Note:-** 1) A copy of the part plan of aforesaid sanctioned modification is available in the office of the Chief Officer, Tumsar Municipal Council, Dist. Bhandara during office hours on all working days for inspection of public for a period of one month.

2) This Notification is also available on department's web site www.urban.maharashtra.gov.in

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

(Pradeep Gohil)
**Section Officer**